**प्रतिनियुक्तीने नियुक्ती**

**श्री.सुनिल शेरखाने, तहसिलदार यांची महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ येथे प्रतिनियुक्तीने नियुक्ती करणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन आदेश क्र. बदली-२०२३/प्र.क्र.१०२/ई-३**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : ३० जून, २०२३

**संदर्भ:-** १) महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५
२) सामान्य प्रशासन विभाग अधिसुचना क्र.एसआरव्ही-२०२१/प्र.क्र.४९/कार्या-१२, दि.१४.०७.२०२१

**शासन आदेश :-**

महाराष्ट्र बदली अधिनियम, २००५ मधील कलम ४ (५) च्या तरतूदीनुसार व महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयेत्तर सेवा आणि निलंबन, बडतर्फी, सेवेतून काढूण टाकणे) नियम, १९८१ च्या नियम-४० मधील परिशिष्ट-२ मधील विहित अटी व शर्तीना अधीन राहून श्री.सुनिल शेरखाने, तहसिलदार यांची **महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ** येथे **३ वर्षांच्या कालावधीसाठी** सक्षम प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने सार्वजनिक सेवेच्या हितार्थ व प्रशासकीय सोयीच्या दृष्टीने **प्रतिनियुक्तीने नियुक्ती** करण्यात येत आहे.

२. सदर आदेश तात्काळ अंमलात येत असून श्री.सुनिल शेरखाने, तहसिलदार यांना सध्याच्या पदस्थापनेवरुन या आदेशानुसार एकतर्फी कार्यमुक्त करण्यात येत आहे.

३. सदरील आदेश हेच कार्यमुक्ततेचे आदेश असून संबंधित विभागीय आयुक्त/ जिल्हाधिकारी यांनी नव्याने आदेश काढण्याची आवश्यकता नाही.

४. **महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ** या कार्यालयातील प्रतिनियुक्तीच्या अनुषंगाने श्री.सुनिल शेरखाने, तहसिलदार यांच्या सेवा सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई यांचेकडे सुपूर्द करण्यात येत आहेत.

५. श्री.सुनिल शेरखाने, तहसिलदार यांनी अपर मुख्य सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई यांचेकडे हजर व्हावे.

६. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०६३०२२२३३७४५१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

AJIT SOPANRAO DESHMUKH

Digitally signed by AJIT SOPANRAO DESHMUKH
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c7f9815c89488c717b56e1ae0b06802c87d325011b06b9fb279823a37e0511b2, pseudonym=06DBBC5D80F944565DD5BDEF080730B6FF4B904B, serialNumber=704CB545C50221B15CDE7CCB8854E694C765DFB3A0240E891EBFB56EE79E3440, cn=AJIT SOPANRAO DESHMUKH
Date: 2023.06.30 22:24:40 +05'30'

**(अजित देशमुख)**
**शासनाचे उप सचिव**

**प्रति,**

१. अपर मुख्य सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
२. विभागीय आयुक्त, पुणे.

**प्रत,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
२. मा. उप मुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

३. मा.मंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव
४. संबंधित जिल्हाधिकारी.
५. प्रधान महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता)/ (लेखा परीक्षा), मुंबई/ नागपूर.
६. संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी.
७. संबंधित अधिदान व लेखा अधिकारी.
८. संबंधित आहरण व संवितरण अधिकारी.
९. अपर मुख्य सचिव (महसूल) यांचे विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
१०. संबंधित तहसिलदार (विभागीय आयुक्त, पुणे यांचेमार्फत).
११. उप सचिव (ई-३) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
१२. निवडनस्ती (ई-३).